महाराष्ट्र संवर्गातील भारतीय पोलीस सेवेतील
अधिका-यांना सुधारीत दराने प्राथमिक गणवेश
अनुदान, गणवेश नवीकरण अनुदान आणि किट
भत्ता मंजूर करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग

शासन निर्णय क्रमांक : गणभ ०४०९/ प्र.क्र.२/ भापोसे कक्ष
गृह विभाग,मंत्रालय, मुंबई-४०००३२,दिनांक:२२ जून,२०१०

वाचा : केंद्र शासनाच्या दि.२५.०८.२००९ च्या राजपत्रात प्रसिध्द
करण्यात आलेल्या भापोसे (गणवेश) नियम १९५४ ला
करण्यात आलेल्या दुरुस्त्या.

## निर्णय

प्रस्तावना :- केंद्र शासनाच्या कार्मिक लोकतक्रारी व निवृत्तीवेतन मंत्रालय, (कार्मिक व प्रशिक्षण विभाग) यांचेद्वारा उपरोक्त नमूद अधिसूचनेद्वारे भारतीय पोलीस सेवा (गणवेश) नियम १९५४ मध्ये सुधारणा करण्यात आल्या आहेत. सदर सुधारणांनुसार भारतीय पोलीस सेवेतील अधिका-यांना अनुज्ञेय प्राथमिक गणवेश अनुदानाचा दर रु.६५००/- ऐवजी रु.१४,५००/- असा सुधारीत करण्यात आला आहे. गणवेश नवीकरण अनुदान दर ७ वर्षाऐवजी दर ३ वर्षानी अनुज्ञेय ठरणार आहे. तसेच भारतीय पोलीस सेवेतील अधिका-यांना अनुज्ञेय किट भत्त्याचा दर रु.१५०/- द.म. ऐवजी रु.३००/- द.म. असा सुधारीत करण्यात आला आहे. भापोसे (गणवेश) नियम १९५४ मध्ये अंतर्भूत नियम ४ ब अन्वये भारतीय पोलीस सेवेतील अधिका-यांना अनुज्ञेय महागाई भत्त्याच्या दरात दरवेळी ५० % ने वाढ झाल्यावर गणवेश अनुदान व किट भत्ता यांचे दरात २५ % वाढ करण्यात येईल. सदर सुधारणा दिनांक.१.९.२००८ पासून अंमलात आल्या आहेत. या अनुषंगाने महाराष्ट्र संवर्गातील भारतीय पोलीस सेवेतील अधिका-यांना अनुज्ञेय प्राथमिक गणवेश अनुदान, गणवेश नवीकरण अनुदान आणि किट भत्ता याच्या दरात सुधारणा करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

शासन निर्णय :-

केंद्र शासनाने उपरोक्त नमूद अधिसूचनेद्वारे प्रसृत केलेल्या सुधारणा, भापोसे (गणवेश) नियम १९५४ मध्ये अंतर्भूत नियम ४ ब बाबतच्या तरतूदी वगळता महाराष्ट्र संवर्गातील भारतीय पोलीस सेवेतील अधिका-यांना दिनांक १.६.२०१० पासून लागू करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. प्राथमिक गणवेश अनुदान व गणवेश नवीकरण अनुदान याबाबतचा खर्च महासंचालक व पोलीस महानिरीक्षक कार्यालयाच्या वेतन व भत्ते या साठीच्या तरतूदीतून अदा करण्यात यावा. किट भत्त्याबाबतचा खर्च महाराष्ट्र संवर्गातील भारतीय पोलीस सेवेतील अधिकारी ज्या विभागात/कार्यालयात कार्यरत आहेत त्या विभागाच्या / कार्यालयाच्या वेतन व भत्ते यासाठीच्या तरतूदीतून अदा करण्यात यावा आणि तो विभागाच्या / कार्यालयाच्या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. यासाठी लागणारी अतिरिक्त तरतूद अर्थसंकल्पित करण्यात यावी.

३.	हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २१३/१०/व्यय-७ दिनांक २१.५.२०१० च्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०१००६२२१९४८२३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शिल्पा खळे )
लेखा अधिकारी (भापोसे कक्ष)
गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
३) मा.गृहमंत्री यांचे सचिव
४) महालेखापाल (ले.व ह.) महाराष्ट्र-१, मुंबई
५) महालेखापाल (ले.व ह.) महाराष्ट्र-२, नागपूर
६) महालेखापाल (ले.व प.) महाराष्ट्र-१, मुंबई
७) महालेखापाल (ले.व प.) महाराष्ट्र-२, नागपूर
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, म.रा.मुंबई
११) भापोसे अधिकारी कार्यरत असलेले सर्व कार्यालय प्रमुख
(महासंचालक व पोलीस महानिरीक्षक,म.रा. यांचेमार्फत)
१२) राज्य संवर्गातील सर्व भापोसे अधिकारी
(महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, म.रा. यांचेमार्फत)
१३) महाराष्ट्र शासनाच्या अधिपत्याखालील संबंधित सांविधिक व सार्वजनिक उपक्रम
(महासंचालक व पोलीस महानिरीक्षक,म.रा. यांचेमार्फत)
१४) सचिव, कार्मिक व प्रशिक्षण, कार्मिक लोक तक्रारी व निवृत्तीवेतन मंत्रालय कार्मिक व प्रशिक्षण विभाग नवी दिल्ली
१५) वित्त विभाग - कार्यासन व्यय- ७
१६) गृह विभाग / कार्यासन - पोल-१, पोल-१अ, पोल-५अ, पोल-५ब
१७) निवडनस्ती